केंद्र शासन अर्थसहाय्यीत निलक्रांती धोरणातंर्गत सागरी व निमखारे क्षेत्रातील मत्स्यव्यवसायाचे एकात्मिक विकास व व्यवस्थापन या योजनेस प्रशासकीय मान्यता

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-२०१६/प्र.क्र. १५९/पदुम-१३**

**मंत्रालय, मुंबई ४०००३२**

**तारीख: १६ ऑक्टोबर, २०१८**

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः केंद्र शासनाचे क्र.२७०३५-१९/२०१५-एफवाय (IV) भाग-२, भारत सरकार, कृषि व शेतकरी कल्याण, पशुसंवर्धन, दुग्ध व मत्स्य व्यवसाय विकास विभाग यांचे निलक्रांती धोरणांची मार्गदर्शक तत्वे दि. १०.०८.२०१६.

२) शासन निर्णय क्रमांकः केंद्र शासनाचे क्र.३१०१३/३/२०१७-एफवाय(पी ॲन्ड एम) भारत सरकार, कृषि व शेतकरी कल्याण, पशुसंवर्धन, दुग्ध व मत्स्य व्यवसाय विकास विभाग यांचे दिनांक २८.९.२०१७ चे प्रशासकीय मंजुरी आदेश.

३) शासन निर्णय क्रमांकः केंद्र शासनाचे क्र.३१०१२/३/२०१७-एफवाय(पी ॲन्ड एम) भारत सरकार, कृषि व शेतकरी कल्याण, पशुसंवर्धन, दुग्ध व मत्स्य व्यवसाय विकास विभाग यांचे दिनांक २८.९.२०१७ चे निधी वितरणाचे मंजुरी आदेश.

४) आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.मत्स्य/नि/१११२०६/४२/ २०१७, (भाग-१),दि.१६.११.२०१७ चा प्रस्ताव.

५) केंद्र शासनाचे क्र.२७०३५-१९/२०१५-एफवाय (IV), भारत सरकार, कृषि व शेतकरी कल्याण, पशुसंवर्धन, दुग्ध व मत्स्य व्यवसाय विकास विभाग यांचे दिनांक १.१.२०१८ चे सुधारीत प्रशासकीय मान्यतेचे आदेश.

**प्रस्तावना :-**

राज्यातील भू-जलाशयीन ,सागरी व निमखारे पाणी क्षेत्रातील मत्स्योत्पादन वाढीस लागण्याच्या दृष्टीकोणातून या तिन्ही क्षेत्रात उपलब्ध साधनसामुग्रीचा वापर करुन मत्स्य उत्पादनात दुपटीने वाढ करण्याचे केंद्र शासनाच्या निलक्रांती धोरणांतर्गत उद्दीष्ट ठरविण्यात आले आहे. या धोरणाअतंर्गत राज्यातील मत्स्यव्यावसाईक, मत्स्यकास्तकार,मत्स्योउद्योजक यांच्या सहयोगाने राज्यातील भू-जलाशयीन, सागरी व निमखारे पाणी क्षेत्रातील नैसर्गिक साधन संपत्तीचा पूर्ण क्षमतेने वापर करून शाश्वत पध्दतीने, जैविक सुरक्षितता व पर्यावरणाचा समतोल राखून मत्स्योत्पादनात वाढ करण्याचे प्रस्तावित आहे. याकरीता केंद्रशासनामार्फत मत्स्यव्यवसाय हा पूरक व अग्रक्रमीत व्यवसाय करण्याचे उद्दीष्ट ठरविण्यात आले आहेत व याद्वारे भू-जलाशयीन व सागरी क्षेत्रातील सामाजिक व आर्थिकदृष्ट्या कमकुवत मत्स्यव्यवसायीकांचे उत्पन्न दुपटीने वाढविण्याचे निश्चित करण्यात आले आहे.

केंद्र शासनाच्या नीलक्रांती २०१६ च्या मार्गदर्शक सूचना व त्यातील अटी व शर्तीच्या अधीन राहून सन २०१६-१७ या वर्षासाठी राज्य शासनाच्या मत्स्यव्यवसाय विभागाअंतर्गत एकूण २१ योजनांना नीलक्रांती अंतर्गत केंद्र शासनाने क्र. ३१०१३-१३/२०१६-एफवाय (३), दि.१०.८.२०१६ च्या आदेशान्वये राज्यात राबविण्यास प्रशासकीय मान्यता दिली आहे. तसेच केंद्र शासनाचे क्र. ३१०१३/३/२०१७-एफवाय (पी ॲन्ड एम) दिनांक २८.९.२०१७ अन्वये आणखी ९ योजनांना प्रशासकीय मंजुरी दिलेली आहे.

केंद्र शासनाने त्यांचे पत्र क्र. २७०३५-१९/२०१५-एफवाय (IV), दि. २८.०९.२०१७ अन्वये नीलक्रांती अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या हिश्यामध्ये बदल केला आहे. त्यानुसार सर्वसाधारण गटासाठी अनुदान ४०% व लाभार्थी हिस्सा ६०% राहणार आहे. सदर ४०% अनुदानामध्ये केंद्र हिस्सा हा ६०% (म्हणजेच एकूण प्रकल्प किंमतीच्या २४ %) राहणार असून राज्याचा हिस्सा ४०% (म्हणजेच एकूण प्रकल्प किंमतीच्या १६%) राहणार आहे. तसेच अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती, महिला व त्यांच्या सहकारी संस्था यांच्यासाठी अनुदान ६० टक्के व लाभार्थी हिस्सा ४० टक्के राहणार आहे. सदर ६०% अनुदानामध्ये केंद्र हिस्सा हा ६०% (म्हणजेच एकूण प्रकल्प किंमतीच्या ३६ %) राहणार असून राज्याचा हिस्सा ४०% (म्हणजेच एकूण प्रकल्प किंमतीच्या २४%) राहील.

## शासन निर्णय :-

केंद्र शासनाने निलंक्राती योजनेतंर्गत सागरी क्षेत्रातील मत्स्यव्यवसायाचे एकात्मिक विकास व व्यवस्थापनाद्वारे राज्याचे मत्स्योत्पादनात दुपटीने वाढ करण्याकरिता ठरवून दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार राज्यातील सागरी व निमखारे क्षेत्रातील खालील योजनांना केंद्र शासनाच्या मंजूर आराखडयाप्रमाणे व ठरवून दिलेल्या कार्यपध्दतीनुसार खालील तक्त्यात नमुद केल्यानुसार प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | एकक/प्रकल्प किंमत | अनुदानाचे स्वरुप | लाभार्थी निकष |
|---|---|---|---|---|
| १ | इंन्सुलेटेड ट्रक कमीत कमी ६ टन क्षमता | रु. १५.०० लक्ष प्रति युनिट | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान - ४०%<br>केंद्र हिस्सा- २४%<br>राज्य हिस्सा- १६%<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसुचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-** | १. लाभार्थीने मासे वाहतुकीसाठी जी काही व्यवस्थापन कार्यरत किंमत लागते ती स्वखर्चाने करावी.<br>२. केंद्र शासन मासे वाहतुक करताना कुठल्याही प्रकारची नुकसान भरपाई, कार्यान्वयन, व्यवस्थापन यास जबाबदार राहणार नाही. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | (१) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा-३६%<br>राज्य हिस्सा-२४%<br><br>(२)लाभार्थी हिस्सा-४०% | ३. लाभार्थ्यांनी मासे वाहतुक करतांना खात्री करुन घ्यावी की, सर्व सोयी सुविधा व व्यवस्थापन आहे किंवा नाही.<br>४. लाभार्थ्याने सर्व नियम पाळूनच संबंधित राज्य/केंद्रीय प्रदेश यांच्या अखत्यारितीतच राहून मासे वाहतुकीची व्यवस्थापन प्रक्रिया कार्यरत केली पाहिजे.<br>५. लाभार्थ्याने मासे वाहतुकीच्या योजनेमध्ये खरेदी केलेल्या इंन्सुलेटेड ट्रकचा फक्त मासेविक्रीसाठी उपयोग करावा. दुसऱ्या कुठल्याही हेतुसाठी वापर करु नये.<br>६. जर लाभार्थी इतर हेतुसाठी इंन्सुलेटेड ट्रकचा वापर करत असेल तर केंद्र शासन त्याच्या अनुदानाची रक्कम व्याजासहित परत घेईल.<br>७. केंद्र शासनाच्या कृषी व पदुम विभागाकडून मासे विक्रीसाठी मिळालेल्या अनुदानातून खरेदी केलेल्या इंन्सुलेटेड ट्रकवर सदर योजनेचे नाव, वर्ष दर्शविले पाहिजे. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | ऑटो रिक्षासह शीतपेटी | रु. २.०० लक्ष प्रति युनिट | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान - ४०%<br>केंद्र हिस्सा- २४%<br>राज्य हिस्सा- १६%<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसुचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(२) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा-३६%<br>राज्य हिस्सा-२४%<br><br>(२)लाभार्थी हिस्सा-४०% | १. लाभार्थीने मासे वाहतुकीसाठी जी काही व्यवस्थापन कार्यरत किंमत लागते ती स्वखर्चाने करावी.<br>२. केंद्र शासन मासे वाहतुक करताना कुठल्याही प्रकारची नुकसान भरपाई, कार्यान्वयन, व्यवस्थापन यास जबाबदार राहणार नाही.<br>३. लाभार्थ्यांनी मासे वाहतुक करतांना खात्री करुन घ्यावी की, सर्व सोयी सुविधा व व्यवस्थापन आहे किंवा नाही.<br>४. लाभार्थ्याने सर्व नियम पाळूनच संबंधित राज्य/केंद्रीय प्रदेश यांच्या अखत्यारितीतच राहून मासे वाहतुकीचे व्यवस्थापन प्रक्रिया कार्यरत केली पाहिजे.<br>५. लाभार्थ्याने मासे वाहतुकीच्या योजनेमध्ये खरेदी केलेली ऑटो रिक्षा हयाचा फक्त मासेविक्रीसाठी उपयोग करावा. दुसऱ्या कुठल्याही हेतुसाठी वापर करु नये.<br>६. जर लाभार्थी इतर हेतुसाठी ऑटो रिक्षाचा वापर करत असेल तर केंद्र शासन त्याच्या अनुदानाची रक्कम व्याजासहित परत घेईल. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ७. केंद्र शासनाच्या कृषी व पदुम विभागाकडून मासे विक्रीसाठी मिळालेल्या अनुदानातून खरेदी केलेल्या ऑटो रिक्षा व शित पेटीवर सदर योजनेचे नाव, वर्ष हे दर्शविले पाहिजे . |
| ३ | मोटरसायकलसह शितपेटी | रु. ०.६० लक्ष प्रति युनिट | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान - ४०%<br>केंद्र हिस्सा- २४%<br>राज्य हिस्सा- १६%<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसुचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(३) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा-३६%<br>राज्य हिस्सा-२४%<br><br>(२)लाभार्थी हिस्सा-४०% | १. लाभार्थीने मासे वाहतुकीसाठी जी काही व्यवस्थापन कार्यरत किंमत लागते ती स्वखर्चाने करावी.<br>२. केंद्र शासन मासे वाहतुक करताना कुठल्याही प्रकारची नुकसान भरपाई, कार्यान्वयन, व्यवस्थापन यास जबाबदार राहणार नाही.<br>३. लाभार्थ्यांनी मासे वाहतुक करतांना खात्री करुन घ्यावी की, सर्व सोयी सुविधा व व्यवस्थापन आहे किंवा नाही<br>४. लाभार्थ्याने सर्व नियम पाळूनच संबंधित राज्य/केंद्रीय प्रदेश यांच्या अखत्यारितीतच राहून मासे वाहतुकीचे व्यवस्थापन प्रक्रिया कार्यरत केली पाहिजे.<br>५. लाभार्थ्याने मासे वाहतुकीच्या योजनेमध्ये खरेदी केलेली मोटरसायकलसह शितपेटीचा फक्त |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | मासेविक्रीसाठी उपयोग करावा. दुसऱ्या कुठल्याही हेतुसाठी वापर करु नये.<br>६. जर लाभार्थी इतर हेतुसाठी मोटरसायकल चा वापर करत असेल तर केंद्र शासन त्याच्या अनुदानाची रक्कम व्याजासहित परत घेईल<br>७. केंद्र शासनाच्या कृषी व पदुम विभागाकडून मासे विक्रीसाठी मिळालेल्या अनुदानातून खरेदी केलेल्या मोटर सायकल व शितपेटी सदर योजनेचे नाव, वर्ष हे दर्शविले पाहिजे . |
| ४ | फिरते मत्स्य विक्री केंद्र | रु.१०.०० लक्ष प्रति युनिट | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान -४० %<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा - ४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(१) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा-४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ४०% | १. लाभार्थ्याने परिपूर्ण प्रकल्प अहवाल व कागदपत्र द्यावे तसेच जमिनीकरीता कुठल्याही प्रकारचे अनुदान दिले जाणार नाही.<br>२. फिरते मासे विक्री केंद्राचा खर्च अंदाजित बाजार दराशी मिळताजुळता असावा.<br>३. बांधकामानंतरचा देखभाल व व्यवस्थापन खर्च लाभार्थ्यांने स्वखर्चाने करावा.<br>४. लाभार्थ्याने प्रकल्प अहवाल हा कागदपत्रांच्या |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | पुराव्यासहीत सादर करावा.<br>५. प्रकल्प प्रस्ताव हा राज्य शासनाच्या स्पष्ट शिफारशीनिशी आला पाहिजे.<br>६. फिरते मत्स्य विक्री केंद्रासाठी किमान चटाई क्षेत्र १००स्के .फुट असावे.<br>७. अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती/ महिला/बेरोजगार यांना प्राधान्य देण्यात येईल. |
| ५ | किरकोळ मासळी विक्री केंद्र व पायाभूत सुविधांचा विकास | रु. ६३.१५ लक्ष | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान -४० %<br>केंद्र हिस्सा- २४ %<br>राज्य हिस्सा- १६ %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०% | १. लाभार्थीने कागदपत्रांची पूर्तता परिपूर्ण करावी ज्यामध्ये जमिनीवर कुठल्याही प्रकारचे ताबा/ओझे असू नये, आर्थिक संसाधन व आवश्यक मंजूरी/ परवानगी इ. कागदपत्रे बरोबर असावीत. जमिनीसाठी कुठल्याही प्रकारचे अनुदान देण्यात येणार नाही.<br>२. लाभार्थीने योजनेचे नियोजन, विक्रीकेंद्राची विशिष्ट मांडणी, बाजारातील सुविधा व अंदाजित खर्च हा व्यावसायिकदृष्टया तयार करण्यात यावा.<br>३. अंदाजित खर्च हा SoRs )Schedule of Rates) च्या अनुषंगाने असावा |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ज्यामध्ये प्रकल्प क्षेत्र व प्रचलित बाजारदर यांचा समावेश असावा.<br>४. बांधकामानंतरचे मासेविक्री केंद्राचे व्यवस्थापन हे लाभार्थ्याने स्वखर्चाने करावे.<br>५. प्रकल्प प्रस्ताव लाभार्थ्याने राज्य शासनाच्या स्पष्ट शिफारशीने सादर करावा.<br>६. सदरील योजनेची अंमलबजावणी ही व्यावसायिकदृष्ट्या योग्य त्या ठिकाणी ठेवून करण्यात यावी. |
| ६ | शिंपले संवर्धन (Bivalve culture):- | रू. ३.०० लक्ष | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान -४० %<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा - ४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(१) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा-४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ४०% | १. शिंपले संवर्धनासाठी आवश्यक असलेला बांबू फळी उभारण्यासाठी आवश्यक असलेली परवानगी विविध विभागाकडून अर्जदाराला मिळवावी लागेल.<br>२. सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी सहकारी संस्था, अ.जा./अ.ज. वर्गातील सहकारी संस्था, नोंदणीकृत कंपन्या, खाजगी कंपन्या इत्यादि अर्ज करु शकतील.<br>३. प्रकल्प किंमतीमध्ये भांडवली खर्च व प्रथम |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | वर्षाचा आवर्ती खर्च याचा समावेश राहील.<br>४. अर्जदारास आवश्यक असलेल्या कागदपत्राच्या पुराव्यासह प्रकल्प अहवाल सादर करावा लागेल. तसेच अर्जदाराला शिंपले संवर्धनाबाबतचे तांत्रिक ज्ञान असणे बंधनकारक राहिल.<br>५. प्रस्ताव राज्य शासनामार्फत शिफारशीसह सादर करणे बंधनकारक राहील. |
| ७ | खुल्या समुद्रात पिंजरा पध्दतीने संवर्धन (Open sea cage culture):- | रू. २५.०० लक्ष | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान -४० %<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा - ४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(१) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा-४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ४०% | १. अर्जदाराने संबंधिताकडून पिंजरे लावण्याबाबतची पूर्व परवानगी प्राप्त करणे आवश्यक आहे.<br>२. ठराविक ठिकाणी मच्छीमार सहकारी संस्था, अ.जा./अ.ज., सहकारी संस्था, महिला स्वयंबचत गट, नोंदणीकृत खाजगी संस्था इत्यादि ५ पिंजऱ्यांचे ४ संच मिळून एकूण २० पिंजऱ्यासाठीचा लाभ घेऊ शकतात.<br>३. प्रति युनिट भांडवली, कार्यान्वय व देखभाल खर्च एक वेळ देय राहील. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ४. अर्जदाराने आवश्यक परवानगी व कागदोपत्री पुरावा व तसेच तांत्रिक ज्ञानाकडून प्राप्त होणारे याबाबतचे स्वयंघोषित प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे. |
| ८ | शितपेटया व बर्फ साठवणूकपेटी विकत घेण्यास अर्थसहाय्य (Assistance for procurement of insulated ice boxes | रु. २५.०० लक्ष | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान -४० %<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा - ४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(१) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा-४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ४०% | १. फक्त पारंपारिक/ स्थानिक (Artisanal) मच्छीमार या योजनेस पात्र राहतील.<br>२. लाभार्थीकडे - (अ) मालकीहक्काचे प्रमाणपत्र, (ब) रिअल क्राफ्ट (ReALCraft) प्रणालीअंतर्गत नौका नोंदणी असावी. (क) मासेमारी परवाना (ड) बायोमेट्रिक कार्ड ओळखपत्र असणे आवश्यक.<br>३. प्रत्येक बोटीसाठी प्रत्येकी ५०० किलो ते १००० किलो क्षमतेच्या २ शीतपेटया प्रत्येक नौकेसाठी आर्थिक सहाय्यास पात्र राहतील.<br>४. राज्य शासन/केंद्र शासित प्रदेश यांनी जुन्या नौकांची योग्यरित्या निर्लेखनाची खातरजमा करावी. (जुन्याच्या बदली नविन नौका बाबत)<br>५. शीतपेटयाकरिता अनुदान मिळण्यासाठी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | अर्जदार सहकारी संस्थेचा सभासद असणे आवश्यक असून त्यांनी संस्थेमार्फत अर्ज करणे आवश्यक आहे.<br>६. सदरचे अनुदान हे ५ वर्षातून एकदा अनुज्ञेय राहील.<br>७. विभागाने मान्य केलेल्या पुरवठाधारकाकडूनच शितपेटया खरेदी करणे बंधनकारक राहील. |
| ९ | पारंपारिक/ स्थानिक मच्छीमारांना लाकडी ऐवजी फायबर नौका खरेदीस अर्थसहाय्य (Assistance to traditional /artisanal fisherman for procurement of FRP boats and ice box) | रु. ४०.०० लक्ष | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान -४० %<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा - ४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(१) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा-४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ४०% | १. फक्त पारंपारिक/स्थानिक (Artisanal) मच्छीमार या योजनेस पात्र राहतील.<br>२. लाभार्थीकडे - (अ) मालकीहक्काचे प्रमाणपत्र, ब) रिअल क्राफ्ट (ReALCraft) प्रणालीअंतर्गत नौका नोंदणी असावी. मासेमारी परवाना (ड) बायोमेट्रिक कार्ड ओळखपत्र असणे आवश्यक.<br>३. प्रत्येक बोटीसाठी प्रत्येकी ५०० किलो ते १००० किलो क्षमतेच्या २ शीतपेटया प्रत्येक नौकेसाठी आर्थिक सहाय्यास पात्र राहतील.<br>४. राज्य शासन/केंद्र शासित प्रदेश यांनी जुन्या नौकांची योग्यरित्या निर्लेखनाची खातरजमा |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | करावी.(जुन्याच्या बदली नविन नौका बाबत)<br>५. शीतपेटयाकरिता अनुदान मिळण्यासाठी अर्जदार सहकारी संस्थेचा सभासद असणे आवश्यक असून त्यांनी संस्थेमार्फत अर्ज करणे आवश्यक आहे.<br>६. सदरचे अनुदान हे ५ वर्षातून एकदा अनुज्ञेय राहील.<br>७. विभागाने मान्य केलेल्या पुरवठाधारकाकडूनच शितपेटया खरेदी करणे बंधनकारक राहील. |
| १० | मासेमारी नंतर प्रक्रियेतील पायाभूत सुविधांचा विकास - बर्फ कारखाने व शीतगृह ( Development of post-harvest infrastructure - ice plant) | रू. १००.०० लक्ष | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान -४० %<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा - ४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(१) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा-४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ४०% | १. लाभार्थ्याने प्रकल्पाची जागा अतिक्रमण विरहित असल्याचे आणि अर्थसहाय्यासह आवश्यक ना हरकत/परवानगी इत्यादि विस्तृत प्रकल्प प्रस्तावात (DPR) कागदोपत्री पुरावा सादर करणे आवश्यक आहे. जागेसाठी अर्थसहाय्य देय राहणार नाही.<br>२. प्रकल्प किंमत ही अद्ययावत SoRs नुसार प्रकल्प ठिकाणच्या सध्याच्या बाजार दरानुसार देय राहील.<br>३. लाभार्थ्याने प्रकल्पाच्या कार्यरत व देखभालीचा |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | भविष्यकालिन खर्च स्वत: करणार असल्याचे प्रमाणित करण्यात यावे.<br>४. लाभार्थ्याने (i व ii) बाबतची प्रकल्पाची सविस्तर माहिती कागदपत्रांच्या स्वयंघोषित पुराव्यासह सादर करावी.<br>५. प्रस्ताव संबंधित राज्य शासन/ केंद्र शासनाच्या स्पष्ट शिफारशी सादर करणे आवश्यक आहे. |
| ११ | कार्यरत बर्फ कारखाना व शीतगृह यांचे नुतनीकरण/ आधुनिकीकरण (Renovation / Modernization of existing ice plants cum cold storages) | रू. ६०.०० लक्ष | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान -४० %<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा - ४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(१) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा-४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ४०% | १. कार्यरत असलेल्या बर्फ कारखान्यातील इमारतीचे बांधकाम मशिनरी बदलणे, विद्युतीकरण, पाणीपुरवठा इत्यादि बाबीचा समावेश नुतनीकरण/आधुनिकीकरण करण्यासाठी अनुज्ञेय राहिल.<br>२. कार्यरत असलेल्या बर्फ कारखान्याची जागा ही लाभार्थीच्या मालकीची असणे आवश्यक आहे.<br>३. कार्यरत असलेला बर्फ कारखाना हा कमीत कमी १० वर्ष जुना असणे आवश्यक आहे.<br>४. अर्थसहाय्या व्यतिरिक्त उर्वरित रक्कम लाभार्थी ज्या संस्थेकडून कर्ज घेणार त्याबाबतचे कागदपत्र असणे आवश्यक आहे. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ५. प्रकल्प किंमत ही अद्यावत SoRs नुसार प्रकल्प क्षेत्रात देय असणे आवश्यक आहे. |
| १२ | निमखारे पाण्यातील कोळंबी संवर्धनासाठी निविष्ठा (Brackishwater shrimp culture- input) | रू. ३००.०० लक्ष | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान -४० %<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा - ४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(१) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा-४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ४०% | १. सदरची योजना एन.एफ.डी.बी.मार्फत व्यावहारिक दृष्टिकोन ठेवूनराबविण्यात येणार आहे.<br>२. प्रस्ताव एन.एफ.डी.बी. कडे सादर करावा.<br>३. प्रस्ताव सादर करण्यापूर्व संबंधित राज्यशासनाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक आहे.<br>४. मच्छीमार सहकारी संस्था, अ.जा. व अ.ज. सहकारी संस्था , महिला बचत गट, नोंदणीकृत व्यावसायिक इत्यादि अर्थसहाय्याकरिता पात्र ठरतील. एका लाभार्थ्यास जास्तीत जास्त ६ पिंजऱ्यांचे १ याप्रमाणे ४ बॅटरी (२४ पिंजरे) अनुज्ञेय राहतील.<br>५. केंद्र व राज्य शासनाच्या संघटना, महामंडळ, संघ, यंत्रणा इत्यादिंना प्रकरणनिहाय अर्थसहाय्य मंजूर करण्यात येईल.<br>६. प्रकल्प किंमतीमध्ये भांडवली, आवर्ती व व्यवस्थापनाचा खर्च समाविष्ट राहिल. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | ७. अर्जदाराने परिपूर्ण प्रस्ताव कागदपत्रे व योग्य त्या परवानग्यासह सादर कराव्या. |
| १३ | निमखारे पाण्यातील कोंळबी बीज उत्पादन केंद्राची उभारणी (Brackishwater hatchery) | रू. ५०.०० लक्ष | **सर्वसाधारण-**<br>(१) अनुदान -४० %<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा - ४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ६०%<br><br>**अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, महिला व महिलांच्या संस्था-**<br>(१) अनुदान-६०%<br>केंद्र हिस्सा- ६० %<br>राज्य हिस्सा-४० %<br>(२) लाभार्थी हिस्सा- ४०% | १. लाभार्थीला कोळंबी बिज उत्पादन केद्रांचे अनुभव असणे आवश्यक आहे.<br>२. लाभार्थी ज्या जागेत संर्वधन करणार आहे ती जागा अतिक्रमण बाधित नसावी. तसेच प्रकल्प उभारण्यासाठी लाभार्थीला स्वत:ला करावयाच्या खर्चासंबंधी वित्तीय कागदपत्रे सादर करणे आवश्यक व तसा उल्लेख डी.पी.आर. नमुद करणे आवश्यक आहे.<br>३. लाभार्थीने त्याच्या कोळंबी बीज उत्पादन केद्रात हे स्थानिक संर्वधकांना घाऊक बाजार भावाने पुरवठा करणे आवश्यक आहे. |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१७१२४११७७४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2018.10.17 12:46:18 +05'30'

**(अनूप कुमार)**
**प्रधान सचिव (पदुम)**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव

३. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
५. सचिव, भारत सरकार, कृषि मंत्रालय, (पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग), कृषि भवन, नवी दिल्ली.
६. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, महाराष्ट्र राज्य,मुंबई
७. अप्पर मुख्य सचिव, (नियोजन), मंत्रालय,मुंबई
८. अप्पर मुख्य सचिव, (वित्त), मंत्रालय, मुंबई
९. सचिव, (सहकार), मंत्रालय,मुंबई
१०. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
११. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे
१२. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/ लातूर/ अमरावती/नागपूर
१३. सर्व सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय
१४. महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा),मुंबई/नागपूर
१५. अधिदान व लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८.सर्व उपकोषागार अधिकारी
१९. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नविन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
२०.राष्ट्रीय मत्स्यजिवी सहकारी संघ, नवी दिल्ली, (Fishcopfed),७ सरिता विहार इंस्टीटयुशनल एरिया, नवी दिल्ली-११००७७. /निवडनस्ती